आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात संघ लोकसेवा आयोगाच्या नागरी सेवा मुख्य परिक्षा व मुलाखत तयारी करीता प्रोत्साहन अनुदानासाठी निधी वितरण. (लेखाशीर्ष २२२५ डी ३८७)

**महाराष्ट्र शासन.**
**आदिवासी विकास विभाग**
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२०/ प्र.क्र.०१/ कार्यासन-६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:-२० नोव्हेंबर, २०२०.

**वाचा -**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४ /अर्थ-३, दि.१६.०४.२०२०.
२) शासन निर्णय ,वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०२० / प्र.क्र.६५ / अर्थ-३, दि.०४.०५.२०२०.
३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र. प्रशिक्षण-२०२०/ प्र.क्र.७५/का-९,दि.१३.११.२०२०.
४) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे पत्र क्र.आसंप्रसं/२०२०/स्पर्धा परिक्षा/ प्र.क्र. / का-४/३४०, दि.१७.११.२०२०.

**प्रस्तावना:-**

राज्यातील अनुसूचित जमातीच्या उमेदवारांचे संघ लोकसेवा आयोगा (UPSC) मार्फत आयोजित करण्यात येणाऱ्या स्पर्धा परिक्षांमध्ये भाग घेण्याचे प्रमाण अल्प आहे. त्यामुळे या उमेदवारांना विकासाच्या मुख्य प्रवाहात आणण्याच्या अनुषंगाने संघ लोकसेवा आयोगा (UPSC) मार्फत आयोजित करण्यात येणाऱ्या नागरी सेवा स्पर्धा परिक्षा उत्तीर्ण होऊन प्रशासकीय अधिकारी होण्याची संधी मिळावी या उद्देशाने अशा उमेदवारांना संघ लोकसेवा आयोगाच्या (UPSC) नागरी सेवा मुख्य परिक्षा आणि मुलाखत तयारीकरीता प्रोत्साहनपर आर्थिक सहाय्य देण्यास संदर्भाधीन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. यास अनुसरून आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरीता निधी मागणीचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र.४ अन्वये शासनास प्राप्त झाला आहे. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात मागणी क्रमांक टी-५ मधील २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या मुख्य शीर्षाखालील अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना भारतीय व राज्य प्रशासकीय सेवेची संधी प्राप्त करून देण्यासाठी त्यांना संघ लोकसेवा आयोग/ महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून घेण्यात येणाऱ्या स्पर्धा परिक्षांचे प्रशिक्षण देणे या योजनेंतर्गत वित्त विभागाच्या अनुमतीने खालीलप्रमाणे निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

(रू.लाखात)

| अ. क्र. | योजनेचे नांव व लेखाशीर्ष | सन २०२०-२१ करीता अर्थसंकल्पित तरतूद | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|
| १ | (०२) (३६) अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना भारतीय व राज्य प्रशासकीय सेवेची संधी प्राप्त करून देण्यासाठी त्यांना संघ लोकसेवा आयोग/ महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून घेण्यात येणाऱ्या स्पर्धा परिक्षांचे प्रशिक्षण देणे (२२२५ डी ३८७), ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) | ५००.०० | १८.५० |

२. वरीलप्रमाणे रू. १८.५० लाख (रू. अठरा लाख पन्नास हजार फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणुन आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. वितरीत निधीतून फक्त संघ लोकसेवा आयोगाची नागरी सेवा पुर्व परिक्षा उत्तीर्ण झालेल्या उमेदवारांसाठी **मुख्य परिक्षा तयारी करीता आर्थिक सहाय्यांतर्गत उमेदवारांस निर्वाहभत्ता, पुस्तक खरेदी** तसेच मुख्य परिक्षा उत्तीर्ण झालेल्या उमेदवारांस **मुलाखत तयारीकरीता आर्थिक प्रोत्साहनपर निर्वाह भत्याचा** खर्च भागविण्यात यावा. लॉक डाऊनमुळे पुढील काही कालावधीमध्ये राज्याची आर्थिक स्थिती गंभीर स्वरूपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पद्धतीने काटकसरीच्या उपाय योजना करुन खर्च करावा.

३. विभाग प्रमुख/ नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतूद त्यांच्या अधिपत्याखालील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना तात्काळ वितरित कराव्यात. तसेच सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१६.०४.२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकिय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात व अनौ.सं.क्र.६३४/ व्यय-१४, दि.१९.११.२०२० अन्वये दर्शविलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१११७१७४००१२०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2020.11.20 14:55:19 +05'30'

**(किरण कि.पवार)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
२. मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
५. अपर आयुक्त, आदिवासी विकास (सर्व)/ प्रकल्प अधिकारी ,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प (सर्व).
६. महालेखापाल (लेखापरिक्षण) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई /नागपूर.
७. उपसचिव / कक्ष अधिकारी (का-९), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती (का-६).